**ग्रामीण रूग्णालय, तलासरी ता.तलासरी जि. पालघर चे ३० खाटांवरुन १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये एक "विशेष बाब" म्हणून श्रेणीवर्धन करण्यास मान्यता देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२४/ प्र.क्र. २७७/ आरोग्य-३अ**

नवीन मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

दिनांक :- ०५ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-**

सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचे पत्र क. आआसे/कक्ष३/टे-७/ग्रारू तलासरी पालघर श्रेणी १०० ठा.मं./जा.क्र.१३४६६-६७/ दि. २७.०६.२०२४.

**प्रस्तावना :-**

तलासरी, ता. तलासरी, जि. पालघर येथील ३० खाटांच्या ग्रामीण रुग्णालयाचे १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करणेबाबत प्रस्ताव आरोग्य सेवा आयुक्तालयाने सादर केला आहे. त्यानुसार याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

ग्रामीण रूग्णालय तलासरी, ता. तलासरी, जि. पालघर येथील रुग्णालयाचे ३० खाटांवरून १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये एक "विशेष बाब" म्हणून श्रेणीवर्धन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर १०० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयासाठी विहीत पध्दतीने जागा उपलब्ध करुन तेथे बांधकाम व पदनिर्मिती करणे याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

३. शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा- २ दि. २५.०९.२०१९ मधील तरतूदींनुसार अंदाजपत्रक व आराखडे सादर करण्यात यावेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०५१२५१५८२५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT,
2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2024.08.05 15:29:29 +05'30'

(अ.भि.मोरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण यांचे खाजगी सचिव.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. संचालक (१), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, पालघर.
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, पालघर.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर
११. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, तलासरी, पालघर
१२. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रूग्णालय, तलासरी, ता. तलासरी, जि.पालघर
१३. नियोजन विभाग, (का.१४७२) मंत्रालय, मुंबई.
१४. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१५. अवर सचिव/का.आ.३, सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई
१६. निवडनस्ती (आरोग्य ३-अ)